

व्सेवॉलद गार्शिन

# प्रवासी बेडकी

अनुवादः अनिल हवालदार
चित्रेः निकिता चारुशिन



रादुगा प्रकाशन
मॉस्को




लोकवाङ्मय गृह प्रा. लि.
मुंबई

कोणे एके काळी एक बेडकी रहात होती. पाणथळ जागी ती बसायची, केंबरे आणि डास पकडून मटकावायची. वसंताच्या मोसमात आपल्या इतर मैत्रिणींबरोबर डरांव डरांव आवाज करीत मोठ्यांदा ओरडायची. अशा रीतीने सारे आयुष्यभर ती सुखात राहिली असती – अर्थात एखाद्या

करकोच्याने तिला गट्ट केले नसते तर! पण एक दिवस अशी घटना घडली, की तिचे सारे जीवन बदलून गेले.

त्या दिवशी पाण्यामधून वर आलेल्या एका खडकाच्या सुळक्यावर बसून कोमट, झिमझिम पावसाचा आनंद ती लुटत होती.

"कित्ती कित्ती छान पाऊस पडतोय आज!" तिच्या मनात विचार आला. "जगण्यात किती मौज आहे!"



तिच्या ठिपकेदार, चकचकीत पाठीवर पाऊस पडत होता. पावसाचे थेंब तिच्या पोटाखाली आणि पायांमागे निथळत होते. वातावरण एवढे प्रसन्न होते की, अतिआनंदाने डरांव डरांव ओरडण्याची तिला खूप इच्छा झाली. पण सुदैवाने तिला आठवण झाली की, तो शरदाचा मोसम होता व बेडक्या शरदात ओरडत नाहीत — त्या फक्त वसंतामध्ये ओरडतात. म्हणून तिने आपली डरांव डरांव गिळून टाकली आणि गप्प बसून ती पावसाची मजा लुटू लागली.

अचानक डोक्याच्या वरच्या दिशेने एक बारीक, शीळ मारल्यासारखा आवाज तिला ऐकू आला. जंगली बदकांची अशी एक जात आहे, जी हवेतून उडत जात असताना त्यांच्या पंखांचा शीळ घातल्यासारखा आवाज होतो. ही बदके सर्वसाधारणपणे खूप उंचीवरून उडत जातात. त्यामुळे ती सहसा दिसत नाहीत; फक्त आवाजावरून त्यांचा कळप कोठे आहे ते समजते. ह्यावेळी मात्र बदके खाली आली व हवेत एक वर्तुळ काढून नेमकी बेडकीचे घर असलेल्या पाणथळीवर उतरली.

"क्वाक्-क्वाक्!" एक बदक म्हणाले. "आपल्याला अजून खूप लांब जायचंय. तेव्हा इथं काहीतरी खाऊ या!"



हे ऐकताच बेडकी पटकन पाण्यात लपली. तिच्यासारख्या मोठ्या, गलेलठ्ठ बेडकीला बदके खाणार नाहीत हे तिला माहीत होते, तरीही खडकाखाली लपणे अधिक इष्ट होते.

पण ती बदके कोठे चालली होती हे माहीत करून घेण्याची बेडकीला उत्सुकता लागली होती. म्हणून थोड्या वेळानंतर तिने आपला बटबटीत डोळ्यांचा चेहरा पाण्याबाहेर काढण्याचे धाडस केले.

"क्वाक्-क्वाक्!" दुसरे बदक म्हणाले. "थंडी पडायला लागलीय. दक्षिणेला लौकर गेलं पाहिजे! लौकर दक्षिणेला चला!"

त्या बदकाच्या म्हणण्याला दुजोरा देण्यासाठी इतर सर्व बदके मोठमोठ्यांदा 'क्वाक्-क्वाक्' ओरडू लागली.

"बदकांनो, मला माफ करा, पण दक्षिण म्हणजे काय? तुम्ही उडत जाणार आहात ती?" बेडकीने घाबरटपणे विचारले.

बदकांनी बेडकीला घेराव घातला. तिला खाऊन टाकावे असा पहिला विचार त्यांच्या मनात आला. पण नंतर प्रत्येक बदकाला वाटले की, ती बेडकी फारच मोठी होती व घशात अडकून बसली असती. मग सारी बदके आपले पंख फडफडवीत एकाच वेळी किंचाळू लागली:

"दक्षिणेत खूप छान आहे! आत्ता तिथं उबदार हवा आहे. सुंदर सुंदर उबदार पाणथळी आहेत. गुबगुबीत किडे आहेत! खरंच, दक्षिणेत फार छान आहे!"

त्यांच्या उत्तेजित आरोळ्यांनी बेडकीचे कान बधीर झाले. सरतेशेवटी कसेबसे तिने त्यांना गप्प केले व इतरांपेक्षा थोड्या जास्त अक्कलवान दिसणाऱ्या बदकाला तिने दक्षिणेबद्दलची माहिती विचारली.

त्या बदकाने जेव्हा दक्षिणेची माहिती सांगितली तेव्हा बेडकीला जाणवले की, दक्षिण खरोखरीच अद्भुत भूमी होती. पण तरीही बेडकीचा स्वभाव फार सावध होता. म्हणून खात्री करून घेण्यासाठी तिने विचारले:

"तिथं केंबरं आणि डास आहेत ना?"

"अरे बापरे! ढगच्या ढग आहेत त्यांचे!" बदक उत्तरले.



बेडकी आनंदाने डरांव डरांव ओरडली. पण झटकन तिने आसपास वळून पाहिले व शरदामध्ये आपण ओरडल्याचे आपल्या मैत्रिणींनी ऐकले नाही, याची खात्री करून घेतली. एकदा तरी डरांव केल्याविना तिला राहवले नव्हते. "मला घेऊन चला ना तुमच्याबरोबर!" ती बदकांना म्हणाली.

"कमाल आहे!" बदक ओरडले. "कसं न्यायचं तुला आमच्याबरोबर? तुला पंख नाहीत!"

"तुम्ही केव्हा उडणार?" बेडकीने विचारले.

"लौकरच! लौकरच!" सगळी बदके ओरडली. "क्वाक्! क्वाक्-क्वाक्! इथं थंडी वाजते. दक्षिणेकडं जायचं! लौकर दक्षिणेकडं!"

"मला विचार करायला पाच मिनिटं वेळ द्या," बेडकी म्हणाली. "मी आत्ता परत येते. तेवढ्यात मला नक्की काहीतरी युक्ती सुचेल!"

तिने खडकावरून परत पाण्यात सूर मारला व विचार करण्यात कसलाही व्यत्यय येऊ नये म्हणून तिने स्वतःला पूर्णपणे चिखलात बुडवून घेतले. पाच मिनिटे संपली. बदकांनी उड्डाण करायचे ठरविले, तेवढ्यात बेडकी उडी मारून खडकावर परतली. तिचा चेहरा उजळला होता – अर्थात बेडकीचा चेहरा जेवढा जास्तीत जास्त उजळू शकतो तेवढा!

"मी विचार केला आणि मला एक युक्ती सुचलीय," बेडकी म्हणाली. "तुमच्यापैकी दोघांनी आपल्या चोचींमध्ये एक डहाळी धरायची आणि त्या डहाळीला मधोमध मी लोंबकळत राहीन. तुम्ही उडत उडत मला घेऊन जायचं. मात्र एकच गोष्ट सांभाळली पाहिजे: तुम्ही क्वाक् क्वाक् ओरडायचं नाही आणि मी डरांव डरांव करायचं नाही. मग सारं काही छान पार पडेल!"

एखाद्या बेडकीला हजारो मैल लांबपर्यंत चोचींमध्ये धरून वाहून न्यायचे आणि एकदाही क्वाक्-क्वाक् ओरडायचे नाही, ही काही फारशी मजेची बाब नव्हती. पण तरीही, त्या बेडकीच्या हुषारीचे बदकांना कौतुक वाटले व बेडकीला आपल्याबरोबर नेण्यास सर्व बदकांनी मान्यता



दिली. दर दोन तासांनी त्यांनी पाळी बदलायचे ठरविले. बदकांची संख्या खूप होती व बेडकी एकटीच होती, त्यामुळे पुनःपुन्हा लौकर पाळी आली नसती. त्यांनी एक छान, बळकट डहाळी शोधली. दोन बदकांनी आपल्या चोचींमध्ये डहाळीची टोके पकडली व बेडकीने मध्यभागी डहाळी तोंडात धरली. बदकांचा सगळा कळप वर आकाशात उडाला.

बदके आकाशात एवढी उंच उडाली की, बेडकीचा जीव घाबराघुबरा झाला. शिवाय त्यांनी डहाळी समांतर रेषेत धरली नव्हती व





डहाळीला सतत हिसके बसत होते. बिचारी बेडकी कागदी ´ विदूषकाप्रमाणे हवेत लटकत होती. आपली पकड सुटेल आणि खाली जमिनीवर आपण आपटून मरू अशा भीतीने तिने सर्व शक्ती एकवटून डहाळीभोवती गच्च जबडा आवळला होता. असे होते तरी ह्या विचित्र अवस्थेची लौकरच तिला सवय झाली व आपल्या सभोवती पहायला तिने आरंभ केला. डहाळीला लोंबकळल्यामुळे खालून वेगाने जाणारी मैदाने, कुरणे, नद्या आणि टेकड्या यांचे नीटसं दर्शन बेडकीला घडत नव्हते. पण तरीही ती थोडेसे मागे वळून व वरच्या बाजूला पाहू शकत होती. तेवढ्यामुळेसुद्धा तिला आनंद होत होता आणि अभिमान वाटत होता.

"किती झकास युक्ती सुचली मला," बेडकी स्वत:शी म्हणाली.

दरम्यान, बेडकीला घेऊन उडणाऱ्या सर्वांत पुढील जोडीमागील इतर बदके मोठमोठ्यांदा ओरडून बेडकीच्या चातुर्याचे कौतुक करीत होती.

"आमची बेडकी खूपच हुषार आहे," बदके म्हणाली. "आमच्या बदकांमध्येसुद्धा एवढी हुषार बदकं फारशी नाहीत!"

त्यांचे आभार मानावे अशी बेडकीला इच्छा झाली. पण वेळीच तिला आठवले की, जर तिने आपले तोंड उघडले, तर त्या प्रचंड उंचीवरून ती खाली कोसळेल. तिने आपला जबडा आणखीच गच्च आवळला व ती चूप राहिली. सबंध दिवसभर ती अशीच लटकत राहिली. उडता उडता बदके आपली पाळी बदलत होती. एका जोडीकडून दुसऱ्या जोडीकडे डहाळी मोठ्या चपळाईने देत होती. अशी अदलाबदल होताना बेडकीला खूप भीती वाटायची व भीतीने डरांव डरांव ओरडावेसे वाटायचे. पण तिला धीर धरणे भाग होते आणि तसा तिने धीर धरला.



संध्याकाळी बदकांचा कळप एका पाणथळीवर उतरला व रात्रभर तेथेच मुक्काम करण्याचे त्यांनी ठरविले. पहाटे त्यांनी परत उड्डाण केले. मात्र ह्यावेळी बेडकीने समोरील दिशेने चेहरा धरला होता. पूर्वीप्रमाणे मागच्या दिशेने ठेवला नव्हता. त्यामुळे खालचे देखावे दिसत होते. पिके कापलेल्या शेतांवरून, पिवळ्या जंगलांवरून आणि पिकांच्या गंजी रचलेल्या खेड्यांवरून बदके उडत होती. लोकांच्या बोलण्यांचे आवाज त्यांना ऐकू येत होते. रायची झोडपणी

करणाऱ्या मोगऱ्यांचे आवाज ऐकू येत होते. बदकांचा कळप पाहण्यासाठी माणसे माना उंचावीत होती व ह्या कळपात काहीतरी विचित्र आढळल्यामुळे आपल्या हातांनी खुणा करून इतरांचे त्याच्याकडे लक्ष वेधीत होती. जमिनीच्या अगदी जवळून, खूप खालून आपण उडत जावे, लोकांनी आपल्याला पहावे आणि ते आपल्याविषयी काय बोलतात ते ऐकावे, असे बेडकीला फार फार वाटत होते. पुढच्या मुक्कामाच्या वेळी ती बदकांना म्हणाली :

"आपण थोडं खालून उडू शकणार नाही का? एवढ्या उंचीवर मला घेरी येते आणि अचानक तशी घेरी येऊन मी खाली पडेन अशी मला भीती वाटते."

एवढ्या उंचीवरून न उडण्याचे दयाळू बदकांनी त्या बेडकीला आश्वासन दिले. दुसऱ्या दिवशी ती बदके एवढी खालून उडत होती की, जमिनीवरची माणसे काय बोलत होती ते त्यांना सहज ऐकू येत होते.

"पहा, पहा," एका खेड्यातील मुले ओरडली. "पहा, बदकं एका बेडकीला घेऊन चाललीत!"

बेडकीने त्यांचे ओरडणे ऐकले व तिचे काळीज धडधडले.

"पहा, पहा," पुढच्या खेड्यातील मुले ओरडली. "असं कधी दिसलं नव्हतं!"

ही युक्ती बदकांची नसून आपली होती हे त्या मुलांना समजेल का? बेडकीच्या मनात येत होते.

"पहा, पहा," तिसऱ्या खेड्यावरून बदके उडत जात असताना तेथील मुले ओरडली. "एवढी झकास युक्ती कुणाला बरं सुचली असावी?"

आता मात्र बेडकीला राहवले नाही आणि धोका विसरून ती बेंबीच्या देठापासून किंचाळली :

"मला! ही युक्ती मला सुचली!"

त्या किंचाळीबरोबरच बेडकी जमिनीकडे फेकली गेली. बदके घाबरून ओरडली. एका बदकाने तर खाली कोसळणाऱ्या बेडकीला हवेतच धरण्याचा प्रयत्न केला, पण त्याचा नेम हुकला. चारी पाय झटकीत बेडकी ताबडतोब खाली पडली. पण बदके खूप वेगात उडत असल्यामुळे, ज्या कठीण रस्त्यावर बेडकी ओरडली होती त्या रस्त्यावर ती पडली नाही, तर आणखी पुढे खेड्याच्या शेवटच्या टोकाला पडली. सुदैवाने एका मोठ्या, घाणेरड्या तळ्यात ती बेडकी कोसळली.

ताबडतोब ती पाण्याबाहेर आली आणि खच्चून जोरात किंचाळली.

"मला! मला ही युक्ती सुचली! मला!"

पण तिचे ओरडणे ऐकायला तेथे कुणीच नव्हते. तळ्यातील बेडक्या ह्या अचानक कोसळण्याच्या आवाजाने घाबरून लपून बसल्या होत्या. आता त्या हळू हळू पाण्याबाहेर येऊ लागल्या व ह्या अनोळखी बेडकीकडे आश्चर्याने पाहू लागल्या.

बेडकीने मग त्यांना सारा अद्भुत इतिहास सांगितला. सबंध आयुष्यभर आपण कसा विचार केला आणि शेवटी प्रवास करण्याची ही अपूर्व युक्ती कशी शोधून काढली ते तिने त्या तळ्यामध्ये



राहणाऱ्या बेडक्यांना सांगितले. आपली स्वतःच्या मालकीची बदके होती आणि तिला पाहिजे तेथे ती बदके घेऊन जायची, अशा बेडकीने बढाया मारल्या. आपण दक्षिणेला गेलो होतो, तेथे खूप सुंदर होते, तिथल्या पाणथळी जागा खूप सुंदर आणि उबदार होत्या, तेथे केंबरांचे ढगच्या ढग होते, इतर अनेक प्रकारचे चवदार कीटक होते, इत्यादी थापा तिने मारल्या.

"तुम्ही कशा काय आहात हे पाहण्यासाठी म्हणून मी इथं थांबले," बेडकी म्हणाली. "तुमच्याबरोबर मी वसंतापर्यंत राहीन. तोवर माझी बदकं सुटीवरून परत येतील. त्यांना मी रजेवर धाडलंय!"

पण बदके कधीच परत आली नाहीत. त्यांना वाटले की, बेडकी त्या कठीण रस्त्यावर आपटून मेली. तिच्याबद्दल त्यांना खूप खूप वाईट वाटले.

